राज्यस्तरीय पुलांच्या संकल्पनात सुसूत्रता राहण्याकरीता समितीचे गठन करणे.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.०५/नियोजन-३**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२,**
**दिनांक:-०६/०३/२०१७.**

**प्रस्तावना:-**

राज्यात नवीन पूल सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत बांधण्यात येतात. सदर नवीन पूल बांधण्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून कंत्राटदाराची नेमणूक करण्यात येते. सर्वसाधारणपणे संकल्पन बांधकाम (Design Build) पध्दतीने निविदा मागविण्यात येतात. स्वाभाविकपणे कंत्राटदार निहाय पूलांचे प्रस्ताव भिन्न-भिन्न पध्दतीचे होतात. बांधकामापूर्वी पूलांचे संकल्पन छाननी करणे तसेच बांधकामानंतर Defect Liability Period नंतर पूलांची दुरुस्ती व देखभाल करणे याकरिता ब-याच वेळेस अडचणी निर्माण होतात.

पूलांच्या विविध लांबीकरीता संकल्पनामध्ये सुसूत्रता असणे. पूलाची रचना अशाप्रकारे असावी की आवश्यक वेळी पूलाचे भाग/घटक बदलणे (replacement) शक्य होईल. किनारी भागात क्षारयुक्त वातावरण असून Prestressed bridge मध्ये वापरलेले Strands गंजण्याची शक्यता जास्त असल्याने किनारी भागात पारंपारिक प्रकारचे (Conventional) पूल बांधणे. पूलांच्या विविध भागांकरीता विविध type plans सा.बां. संकल्पचित्र मंडळाकडे उपलब्ध आहेत ते जास्तीत जास्त वापरणे. इत्यादी बाबी विषद करुन राज्यातील नविन पुल बांधतांना संपूर्ण राज्याकरीता पुलांचे नियोजन व संकल्पचित्र यामध्ये सुसूत्रता असावी जेणेकरुन पुलांचे आयुर्मान वाढविता येईल तसेच पूलांची देखभाल व दुरुस्ती करणे सोपे होईल. याबाबतीत सुसूत्रता व एकसूत्रता असावी अशी मानके तयार करण्यात यावीत. यावर शासन स्तरावर विचार चालू होता. त्याकरीता एका राज्यस्तरीय समितीचे गठन प्रस्तावित आहे.

**शासन आदेश :-**

पूलांच्या संकल्पानामध्ये सुसूत्रता राहावी याकरीता खालील अधिका-यांची समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. चंद्रशेखर तुंगे,<br>मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,अमरावती | अध्यक्ष |
| २ | श्री.एस.एस.भोंगे,<br>अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र (पूल) मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई | सदस्य |
| ३ | श्री.ए.टी.धोंडगे,<br>कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम, पुर्व विभाग, पुणे | सदस्य |
| ४ | श्री.पी.एम.बावीस्कर,<br>कार्यकारी अभियंता, संकल्पचित्र विभाग (पूल), नाशिक | सदस्य |
| ५ | श्री.एम.आय.शेख,<br>सहाय्यक अभियंता (श्रेणी-१) मुख्य अभियंता (सा.बां.) प्रादेशिक विभाग कार्यालय, औरंगाबाद | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

या समितीने राज्यातील पूल बांधतांना सर्व प्रादेशिक विभागांच्या भौगोलीक रचनेचा विचार करुन पुलांची रचना, पूल बांधण्यामध्ये सहज उपलब्ध होणारे साहित्य, तसेच सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कार्यरत अभियंत्यांचे पूल बांधण्याबाबतचा पुर्वानुभव, केंद्र शासनाचे पूल बांधण्याविषयीचे धोरण/तांत्रिक परिपत्रके, तसेच भारतीय प्रौद्योगिक संस्था (IIT) वा तत्सम सर्वोच्च तांत्रिक संस्था याचे प्रकाशित मार्गदर्शक तत्वे/परिपत्रके इत्यादींचा अभ्यास करुन आपला अहवाल पूलांची देखभाल व दुरुस्ती संहितेसह (Manual for Maintenance & Repairs of Bridges) शासनास ३ महिन्यांचा आत सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०३०६१६३५३०५९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash K Ingole

Digitally signed by Prakash K Ingole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DEPUTY SECRETARY BLDS, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3e67265689b1060d15b7956db930c838cb8188 45016d02e4d9d24a7fe1f2309, cn=Prakash K Ingole
Date: 2017.03.06 16:37:42 +05'30'

**(प्रकाश इंगोले)**

उपसचिव (रस्ते), महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.

२. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ.

३. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग/जिल्हा परिषद (सा.बां.) विभाग.

४. निवडनस्ती.